**हाताने मैला उचलणा-या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन अधिनियम, २०१३ च्या अंमलबजावणी. दुषीत गटारामध्ये मृत्यु पावलेल्या मॅन्युअल स्कॅव्हेंजर्सना/ सफाई कामगारांना मा.सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णयानुसार नुकसान भरपाई अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्र. हामैऊ-२०१९/प्र.क्र. २६८/अजाक**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १२ डिसेंबर, २०१९.

**वाचा :**

१. हाताने मैला उचलणा-या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन करणे अधिनियम २०१३,
२. रिट याचिका (सिव्हील) क्रमांक- ५८३/२००३ मध्ये मा.सर्वोच्च न्यायालयाने दिनांक २७/३/२०१४ रोजी दिलेले आदेश.
३. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन परिपत्रक क्रमांक-सफाई २०१३/प्र.क्र.२११ (भाग-२)/ महामंडळे, दि.१६/१०/२०१४,
४. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक-हामैऊ २०१५/प्र.क्र.१९६/अजाक-१, दि.७/८/२०१५,
५. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक-हामैऊ २०१८/प्र.क्र.१०७/अजाक, दि.११/६/२०१९,
६. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन अधिसूचना क्रमांक-हामैऊ २०१८/प्र.क्र.३८२ (भाग१)/अजाक, दि.३१/७/२०१९,
७. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन अधिसूचना क्रमांक-हामैऊ २०१८/प्र.क्र.३८२ (भाग२)/अजाक, दि.३१/७/२०१९,
८. गृह विभाग, शासन अधिसूचना क्रमांक-पीआरओ ०८१९/प्र.क्र.३०२/विशा-२, दिनांक २०/९/२०१९.

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाने हाताने मैला उचलणा-या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन करणे अधिनियम २०१३ (२०१३ चा २५) पारीत केला असून सदर कायदा दि. ६ डिसेंबर, २०१३ पासून लागू केला आहे. या अधिनियमांतर्गत केंद्र शासनाने नियम केले असून सदर नियम १२ डिसेंबर, २०१३ च्या भारत सरकारच्या राजपत्रात प्रसिध्द करण्यात आले आहेत.

**२.** उपरोक्त अधिनियम व त्या अंतर्गत केलेले नियम यांची अंमलबजावणी करण्यासाठी मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन क्र.५८३/२००३ मध्ये दिनांक २७/३/२०१४ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार केंद्र शासनाच्या सन २०१३ च्या अधिनियमाची काटेकोर अंमलबजावणीबाबत कार्यवाही करणे व मॅन्युअल स्कॅव्हेंजर्स यांचे मृत्युबाबत नुकसान भरपाई अदा करण्याचे आदेश सर्व राज्य शासन आणि केंद्र शासित प्रदेश यांना दिले आहेत.

३. मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन ५८३/२००३ मध्ये दि.२७/०३/२०१४ रोजी खालील प्रमाणे आदेश दिले आहेत:-

14 (i) The persons included in the final list of manual scavengers under Sections 11 and 12 of the 2013 Act, shall be rehabilitated as per the provisions of Part IV of the 2013 Act, in the following manner, namely:-

(a) Such initial, one time, cash assistance, as may be prescribed;

(b) Their children shall be entitled to scholarship as per the relevant scheme of the Central Government or the State Government or the local authorities, as the case may be;

(c) They shall be allotted a residential plot and financial assistance for house construction, or a ready built house with financial assistance, subject to eligibility and willingness of the manual scavenger as per the provisions of the relevant scheme;

(d) At least one member of their family, shall be given, subject to eligibility and willingness, training in livelihood skill and shall be paid a monthly stipend during such period;

(e) At least one adult member of their family, shall be given, subject to eligibility and willingness, subsidy and concessional loan for taking up an alternative occupation on sustainable basis, as per the provisions of the relevant scheme;

(f) Shall be provided such other legal and programmatic assistance, as the Central Government or State Government may notify in this behalf.

(ii) If the practice of manual scavenging has to be brought to a close and also to prevent future generations from the inhuman practice of manual scavenging, rehabilitation of manual scavengers will need to include:-

(a) Sewer deaths - entering sewer lines without safety gears should be made a crime even in emergency situations. For each such death, compensation of Rs.10 Lakhs should be given to the family of the deceased.

(b) Railways - should take time bound strategy to end manual scavenging on the tracks.

(c) Persons released from manual scavenging should not have to cross hurdles to receive what is their legitimate due under the law.

(d) Provide support for dignified livelihood to safai karmachari women in accordance with their choice of livelihood schemes.

(iii) Identify the families of all persons who have died in sewerage work (manholes, septic tanks) since 1993 and award compensation of Rs.10 Lakhs for each such death to the family members depending on them.

(iv) Rehabilitation must be based on the principles of justice and transformation.

अशा प्रकारे मा. सर्वोच्च न्यायालयाने उपरोक्त प्रकरणी मुख्यत: मल:निस्सारण कुंड, खड्डे, भुमीगत गटारे, मल:निस्सारण वाहिन्यामधील (यापुढे "उक्त दुषीत गटारे"संबोधीले जाईल.) मृत्यु - कोणत्याही आपत्कालीन परिस्थितीतही सुरक्षित साधनांशिवाय उक्त दुषीत गटारात उतरणे हा गुन्हा मानण्यात यावा, अशा प्रत्येक मृत्युकरीता त्या व्यक्तीच्या कुटूंबाला रु.१० लाख नुकसान भरपाई देण्यात यावी. तसेच, अशा प्रकारे सन १९९३ पासून दुषीत गटारांमध्ये काम करतांना मृत्यु पावलेल्या कामगारांच्या कुटूंबांचा शोध घेऊन अशा प्रत्येक कुटूंबाला रु.१० लाख नुकसान भरपाई देण्यात यावी, असे आदेश दिलेले आहेत. मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार दुषीत गटारांमध्ये काम करतांना मृत्यु पावलेल्या हाताने मैला उचलणाऱ्या कामगारांच्या कुटुंबाला नुकसान भरपाई देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन क्र.५८३/२००३ मध्ये दिनांक २७/३/२०१४ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार सन १९९३ पासून सफाई कामगार/ मॅन्युअल स्कॅव्हेंजर्सचे काम करतांना उक्त दुषीत गटारामध्ये मृत्यु पावलेल्या कामगारांच्या कुटूंबांचा शोध घेऊन अशा मृत्यु पावलेल्या कामगारावर अवलंबुन असणाऱ्या कुटूंबातील सदस्यांना रु.१० लाख नुकसान भरपाई देण्यात यावी. उपरोक्त नुकसान भरपाई देण्यासाठी खालीलप्रमाणे सक्षम प्राधिकारी (जबाबदार अधिकारी) निश्चीत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | ज्यांच्या अधिनस्त घटना घडली ते क्षेत्र<br>(ज्या क्षेत्रात/अधिनस्त दुषीत गटारामध्ये सफाई कामगाराचा मृत्यु झाला ते क्षेत्र/ आस्थापना/ कार्यालय) | कामगाराचा प्रवर्ग (दुषीत गटारामध्ये मृत्यु पावलेल्या कामगाराचा प्रवर्ग) | १० लक्ष रूपये देणारा सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|---|
| १. | महानगर पालिका क्षेत्र | महानगर पालिका सफाई कामगार (नियमित/कंत्राटी तत्वावर/रोजंदारी/ बाह्यस्रोताद्वारे)<br>(महापालिकेने नेमलेल्या खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्रोताद्वारे कंत्राटाद्वारे महापालिकेच्या कामासाठी नियुक्त सफाई कामगारांचा सुध्दा यामध्ये समावेश होईल.) | आयुक्त महापालिका<br>(महापालिकेने त्यांच्या स्वत:च्या उत्पनातुन) |
| २. | नगर परिषद/ नगरपालिका/ नगरपंचायती | नगर परिषद/ नगरपालिका/ नगरपंचायती सफाई कामगार (नियमीत/कंत्राटी तत्वावर/ रोजंदारी/ बाह्यस्रोताद्वारे) | मुख्याधिकारी, नगर परिषद/ नगरपालिका / नगरपंचायत (उक्त |

| | | | |
|---|---|---|---|
| | | (नगरपालिकेने/ नगरपरिषद/ नगरपंचायतीने खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोताद्वारे कंत्राटाद्वारे नगर परिषद/ नगरपालिका कामासाठी नियुक्त सफाई कामगारांचा सुध्दा यामध्ये समावेश होईल.) | नगरपरिषद/ नगरपालिका/ नगरपंचायती यांनी त्यांचे स्वत:च्या उत्पन्नातुन ) |
| ३. | जिल्हा परिषद/ पंचायत समिती/ग्रामपंचायत | जिल्हा परिषद/ पंचायत समिती/ ग्रामपंचायत सफाई कामगार (नियमीत/कंत्राटी तत्वावर/ रोजंदारी/ बाह्यस्त्रोताद्वारे) (जिल्हा परिषद/ पंचायत समिती/ ग्रामपंचायती यांचेकडील<br>( खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोताद्वारे कंत्राटाद्वारे जिल्हा परिषद/ पंचायत समिती/ ग्रामपंचायत कामासाठी नियुक्त सफाई कामगारांचा सुध्दा यामध्ये समावेश होईल.) | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (जिल्हा परिषदेच्या सेस फंडातुन ) |
| ४. | राज्य शासनाचे कार्यालय/ आस्थापना | राज्य शासनाचे कार्यालय/ आस्थापना यांचेकडील सफाई कामगार (नियमीत/कंत्राटी तत्वावर/ रोजंदारी/ बाह्यस्त्रोताद्वारे) (राज्य शासनाचे कार्यालय/ आस्थापना यांनी खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोताद्वारे कंत्राटाद्वारे राज्य शासनाचे कार्यालय/ आस्थापना यांचेकडील कामासाठी नियुक्त सफाई कामगारांचा सुध्दा यामध्ये समावेश होईल.) | कार्यालय/ आस्थापना प्रमुख<br>(कार्यालयीन / आस्थापना खर्चातून किंवा संबंधीत कर्यालये/ आस्थापना यांचेकडील उपलब्ध निधीतुन.) |
| ५. | महाराष्ट्र शासनाचा उपक्रम असलेल्या संस्था (Parastatal Organisations/State owned Entity) MMRDA, | महाराष्ट्र शासनाचा उपक्रम असलेल्या संस्था (Parastatal Organisations /State owned Entity) e.g.MMRDA, CIDCO, MHADA, NMRDA, PMRDA, | संबधित संस्थांचे प्रशासकीय प्रमुख/ व्यवस्थापकीय संचालक/ |

| | | | |
|---|---|---|---|
| | CIDCO,MHADA,NMRDA, PMRDA, PCNTD इत्यादी | PCNTD यांचे सफाई कामगार (नियमीत/कंत्राटी तत्वावर/ रोजंदारी/ बाह्यस्त्रोताद्वारे)<br>(खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोताद्वारे कंत्राटाद्वारे महाराष्ट्र शासनाचा उपक्रम असलेल्या संस्थामध्ये कामासाठी नियुक्त सफाई कामगारांचा सुध्दा यामध्ये समावेश होईल.) | मुख्य कार्यकारी अधिकारी/<br>महानगर आयुक्त (संबंधित संस्थेच्या उत्पन्नातुन ) |
| ६. | राज्य शासनाचे अंगीकृत उपक्रम/ महामंडळे | राज्य शासनाचे अंगीकृत उपक्रम/ महामंडळे यांचेकडील सफाई कामगार (नियमीत/कंत्राटी तत्वावर/ रोजंदारी/ बाह्यस्त्रोताद्वारे)<br>( राज्य शासनाचे अंगीकृत उपक्रम/ महामंडळे यांनी नेमलेल्या खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोताद्वारे कंत्राटाद्वारे राज्य शासनाचे अंगीकृत उपक्रम/ महामंडळे कामासाठी नियुक्त सफाई कामगारांचा सुध्दा यामध्ये समावेश होईल.) | संबधित संस्थांचे प्रशासकीय प्रमुख/ व्यवस्थापकीय संचालक/मुख्य कार्यकारी अधिकारी (संबंधित उपक्रमे / महामंडळे यांचे स्वत:चे उत्पन्नातुन ) |
| ७. | राज्य शासनामार्फत अनुदान/ कर्ज मिळत असलेले साखर कारखाने/सुतगिरण्या/ सहकारी संस्था | राज्य शासनामार्फत अनुदान/ कर्ज मिळत असलेले साखर कारखाने/ सुतगिरण्या/ सहकारी संस्था सफाई कामगार (नियमीत/कंत्राटी तत्वावर/ रोजंदारी/ बाह्यस्त्रोताद्वारे)<br>( राज्य शासनामार्फत अनुदान/ कर्ज मिळत असलेले साखर कारखाने/<br>सुतगिरण्या/ सहकारी संस्था यांनी नेमलेल्या खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोताद्वारे कंत्राटाद्वारे उपरोक्त साखर कारखाने/ सुतगिरण्या/ सहकारी संस्थांच्या कामासाठी नियुक्त सफाई कामगारांचा सुध्दा यामध्ये समावेश होईल.) | संबधित संस्थांचे सचिव (संबंधीत संस्थेच्या स्वत:च्या उत्पन्नातुन ) |

| | | | |
|---|---|---|---|
| ८. | महाराष्ट्र राज्यातील कटक मंडळे | महाराष्ट्र राज्यातील कटक मंडळे येथील सफाई कामगार (नियमीत/कंत्राटी तत्वावर/ रोजंदारी/ बाह्यस्त्रोताद्वारे) महाराष्ट्र (राज्यातील कटक मंडळांनी नेमलेल्या खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोताद्वारे कंत्राटाद्वारे उपरोक्त महाराष्ट्र राज्यातील कटक मंडळे यांच्या कामासाठी नियुक्त सफाई कामगारांचा सुध्दा यामध्ये समावेश होईल.) | संबधीत कटक मंडळाचे प्रशासकीय प्रमुख (संबंधित कटक मंडळाच्या उत्पन्नातुन) |
| ९. | महाराष्ट्र राज्यातील रेल्वे परिक्षेत्र | महाराष्ट्र राज्यातील रेल्वे परिक्षेत्रातील सफाई कामगार (नियमीत/कंत्राटी तत्वावर/ रोजंदारी/ बाह्यस्त्रोताद्वारे) (महाराष्ट्र राज्यातील रेल्वेने नेमलेल्या खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोताद्वारे कंत्राटाद्वारे उपरोक्त महाराष्ट्र राज्यातील रेल्वेच्या कामासाठी नियुक्त सफाई कामगारांचा सुध्दा यामध्ये समावेश होईल.) | मुख्य प्रबंधक,रेल्वे (संबंधीत रेल्वेकडे उपलब्ध असलेल्या निधीतुन ) |
| १०. | केंद्र शासनाचे कार्यालय/ आस्थापना | केंद्र शासनाचे कार्यालय/ आस्थापना यांचेकडील सफाई कामगार (नियमीत/कंत्राटी तत्वावर/ रोजंदारी/ बाह्यस्त्रोताद्वारे) (केंद्र शासनाचे कार्यालय/ आस्थापना यांनी खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोताद्वारे कंत्राटाद्वारे केंद्र शासनाचे कार्यालय/ आस्थापना यांचेकडील कामासाठी नियुक्त सफाई कामगारांचा सुध्दा यामध्ये समावेश होईल.) | कार्यालय/ आस्थापना प्रमुख (कार्यालयीन / आस्थापना खर्चातून किंवा संबंधीत कर्यालये/ आस्थापना यांचेकडील उपलब्ध निधीतुन.) |

| | | | |
|---|---|---|---|
| ११. | उपरोक्त अ.क्र. १ ते १० मध्ये नमूद कार्यालये/ आस्थापना/ संस्था व्यतिरिक्त उर्वरीत खाजगी क्षेत्र तसेच इतर क्षेत्रामध्ये घडलेल्या घटना. | उपरोक्त अ.क्र. १ ते १० मध्ये नमूद कार्यालय/आस्थापना/संस्था व्यतिरिक्त उर्वरीत खाजगी क्षेत्र तसेच इतर क्षेत्रामध्ये नियुक्त सफाई कामगार (नियमीत/कंत्राटी तत्वावर/ रोजंदारी/ बाह्यस्त्रोताद्वारे) (उपरोक्त ठिकाणी नेमलेल्या बाह्यस्त्रोताद्वारे तथा कंत्राटाद्वारे नियुक्त सफाई कामगारांचा सुध्दा यामध्ये समावेश होईल ) | उपरोक्त अ.क्र. १ ते १० मध्ये नमूद कार्यालये/ आस्थापना/ संस्था व्यतिरिक्त उर्वरीत खाजगी क्षेत्र यांचे प्रमुख त्यांच्या निधीतून (या प्रकरणी संबंधितांना रु. १० लाख नुकसान भरपाई देतील व ते मिळाल्याबाबतची खात्री जिल्हाधिकारी यांनी करावी. |

२. हाताने मैला उचलणाऱ्या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन अधिनियम, २०१३ च्या अंमलबजावणीसाठी दिनांक ३१ जुलै, २०१९ च्या अधिसूचनेन्वये जिल्हा स्तर व उपविभागीय स्तरावर दक्षता समित्या गठीत करण्यात आलेल्या आहेत. या दक्षता समित्यांनी नियमीतपणे बैठका घेऊन त्यांच्या कार्यक्षेत्रातील मॅन्युअल स्कॅव्हेंजर्सचे दुषीत गटारांमध्ये काम करतांना १९९३ पासुन दुषीत गटारामध्ये मृत्यु पावलेल्या कामगारांच्या प्रकरणांचा आढावा घ्यावा. तसेच, मा. सर्वोच न्यायालयाच्या आदेशानुसार मॅन्युअल स्कॅव्हेंजर्सचे काम करतांना दुषीत गटारामध्ये मृत्यु पावलेल्या कामगारावर अवलंबुन असणाऱ्या कुटूंबातील सदस्यांना रु.१० लाख नुकसान भरपाई देण्याची सर्वस्वी जबाबदारी उपरोक्त (१) मध्ये दिलेल्या तक्त्याप्रमाणे संबंधीत प्राधिकारी यांची राहील. त्यानुसार संबंधीत जिल्हाधिकारी यांनी नुकसान भरपाईचा आढावा घ्यावा व नुकसान भरपाई संबंधीत दुषीत गटारामध्ये मृत सफाई कामगाराच्या कुटूंबाला तात्काळ मिळेल याची दक्षता घ्यावी. जिल्हाधिकारी यांनी यासंदर्भात केलेल्या कार्यवाहीचा अहवाल आयुक्त (समाज कल्याण), महाराष्ट्र राज्य, पुणे, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई तथा संबंधीत विभागास पाठवावा.

३. सदर प्रकरणी दुषीत गटारामध्ये मृत्यु पावलेल्या सफाई कामगारावर अवलंबुन असणाऱ्या कुटुंबास यापूर्वी इतर देय स्वरूपात (उदा. Workman Compensation Act व इतर अनुषंगिक स्वरूपात किंवा अन्य कोणत्याही कायदा/ नियम/ योजनेखाली मिळालेली ) नुकसान भरपाई दिलेली असली तरी मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार रूपये १० लाख नुकसान भरपाई स्वतंत्रपणे देणे बंधनकारक राहील. याचाच अर्थ उक्त नुकसान भरपाई संबंधीत दुषीत गटारामध्ये मृत्यु पावलेल्या सफाई कामगारावर अवलंबुन असलेल्या कुटूंबास देय इतर लाभाव्यतिरीक्त/ इतर नुकसान भरपाई व्यतिरिक्त असेल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१९१२१२१५२४०९८४२२ असा आहे. हा शासन निर्णय डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

AJOY MEHTA

Digitally signed by AJOY MEHTA
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6cd985f04d38fef50575485613130 7df708dca9bbcea90df80882d2257d79126, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=85c1fa2cdc7cf754bc479fb6a e97bc65889de163fa7e4c775fec1ed9e37334 f3, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=AJOY MEHTA
Date: 2019.12.12 15:58:43 +05'30'

**(अजोय मेहता)**
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. विरोधी पक्षनेता, विधान सभा/ विधान परिषद, विधान मंडळ, मुंबई,
२) सर्व सन्माननीय सदस्य, विधान सभा/ विधान परिषद,
३) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,महाराष्ट्र राज्य, मुंबई,
४) मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
५) मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६) मा.राज्य मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
८) सर्व अ.मु.स./ प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई,
९) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
११) सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य,
१२) मुख्याधिकारी, MHADA, CIDCO, MMRDA, NMRDA, PMRDA. PCNDT,
१३) सर्व जिल्हाधिकारी,
१४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, महाराष्ट्र राज्य,
१५) सर्व मुख्याधिकारी, नगर परिषद/ नगरपालिका, महाराष्ट्र राज्य,
१६) सर्व प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण,
१७) सर्व सहाय्यक आयुक्त,समाजकल्याण,
१८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१९) प्रमुख, कटकमंडळे, महाराष्ट्र राज्य,
२०) मुख्य प्रबंधक,रेल्वे, महाराष्ट्र राज्य,
२१) केंद्र शासनाची महाराष्ट्र राज्यातील सर्व कार्यालये,
२२) राज्य शासनाची सर्व कार्यालये,
२३) सर्व साखर कारखाने, सुतगिरण्या, सहकारी संस्था यांचे अध्यक्ष/सचिव, महाराष्ट्र राज्य,
२४) राज्य शासनाचे अंगीकृत उपक्रम/ महामंडळे या संस्थांचे प्रशासकीय प्रमुख/ व्यवस्थापकीय संचालक/मुख्य कार्यकारी अधिकारी/ महानगर आयुक्त, महाराष्ट्र राज्य,
२५) निवडनस्ती (अजाक).